**सोलापूर येथे नवीन विमानतळाची उभारणी करणेसाठी जमिन संपादना-करिता सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय,क्रमांक-एव्हीएन.२००९/प्र.क्र.५७१/२८-अ
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांकः- ४ फेब्रुवारी २०१०

**वाचाः-** (१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एव्हीएन.१००८/प्र.क्र.५३८/२८अ, दिनांक १३ जून २००८ आणि दिनांक २३ सफ्टेंबर २००८.
(२) सल्लागार(वित्त व प्रशासन), महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचे पत्र क्र.एमएडीसी/एफआयएन/२२६०, दिनांक ३० जानेवारी,२०१०

**प्रास्ताविक :-**

संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १३ जून २००८ अन्वये सोलापूर पासून १३ कि.मी. अंतरावर सोलापूर-हैद्राबाद राष्ट्रीय महामार्ग क्र.९ च्या उत्तरेला मौजे बोरमणी आणि मौजे तांदुळवाडी दरम्यान महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित मार्फत सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर नवीन विमानतळाची उभारणी करणेसाठी व जमिन संपादन, इत्यादी अनुषंगिक बाबींसाठी प्रशासकीय मान्यता दिली असून, शासन निर्णय दिनांक २३ सप्टेंबर २००८ अन्वये वित्तीय मान्यता आणि एकूण रु.१४.५० कोटी सहाय्यक अनुदान मंजूर करण्याकरिता मान्यता दिली आहे. याप्रकरणी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी संदर्भाधीन दिनांक ३० जानेवारी २०१० च्या पत्रान्वये जमिन संपादनाप्रित्यर्थ एकूण रु.२८.५० कोटी सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

२. मौजे बोरमणी आणि मौजे तांदुळवाडी, (जिल्हा-सोलापूर) दरम्यान महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित मार्फत सार्वजनिक-खाजगी सहभाग तत्वावर नवीन विमानतळाची उभारणी करणेसाठी खाजगी जमीन संपादन करण्याकरिता शासन महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना एकूण रु.२८.५० कोटी (रुपये अठ्ठावीस कोटी पन्नास लक्ष फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर करण्यासाठी मान्यता देत आहे.

३. या प्रकरणी उपरोक्त रु. २८.५० कोटी सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित याना अदा करण्यासाठी सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमान चालन

संचालनालय, जुहू, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू एकूण रु.२८.५० कोटी सहाय्यक अनुदान मासिक निधी वितरण प्रणालीनुसार फेब्रुवारी २०१० मध्ये वितरणासाठी उपलब्ध आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी या प्रकरणीचा विहीत अहवाल शासन आणि महालेखापालांना सादर करावा.

४. यांप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च सन २००९-१० च्या वार्षिक अंदाजपत्रकामध्ये खाली नमुद केलेल्या लेखाशीर्षातंर्गत मंजूर तरतुदीतून भागविण्यांत यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यांप्रित्यर्थचा खर्चाचा प्रगती अहवाल शासन आणि महालेखापालांना सादर करावा.

मागणी क्रमांक- ए-७
३०५३- नागरी विमान चालन
१९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य- राज्य योजना
(००)(०२) महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस विमानतळाच्या विकासाकरिता
सहाय्यक अनुदान (३०५३०१६४)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने सदर विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-अनौसे-७५/व्यय-४/दिनांक ४ फेब्रुवारी २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१००२०४१८५३५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( अं.वि.अंभिरे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव ,मंत्रालय, मुंबई
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,मुंबई
अपर मुख्य सचिव (महसूल/वने), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव(नियोजन), नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव(वित्त), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई

सचिव(विमानचालन), समान्य प्रशासन विभाग ,मंत्रालय, मुंबई
विभागीय आयुक्त,पुणे विभाग, पुणे
जिल्हाधिकारी, सोलापूर
आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
संचालक/सहाय्यक संचालक, विमान चालन संचालनालय, जुहू, मुंबई
उपसचिव, वित्त विभाग,अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-४/ व्यय-४,मंत्रालय, मुंबई
उपसचिव(अर्थसंकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव(विमानचालन)यांचे स्वीय सहाय्यक, सा.प्र.विभाग ,मंत्रालय, मुंबई
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती